**केंद्र शासनाच्या "सांख्यिकी सक्षमीकरणासाठी सहाय्य" या योजनेच्या अंमलबजावणीसाठी राज्यस्तरीय समित्या स्थापन करणेबाबत व "नोडल अधिकारी" घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नियोजन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : असांसं १३१९/४८५/प्र.क्र. ६९/का-१४१७**

मंत्रालय, मुंबई - ४०००३२

दिनांक : ९ ऑक्टोबर, २०२०

<u>वाचा</u> : १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक डीईएस-२००९/प्र.क्र. ४९/०९/का-१४१७ दिनांक १६ नोव्हेंबर, २०१०

२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक डीईएस-२०१०/प्र.क्र. १२७/१०/का-१४१७ दिनांक २२ नोव्हेंबर, २०१०

**<u>प्रस्तावना:</u>**

केंद्र शासनाच्या "इंडिया स्टॅटिस्टिकल स्ट्रेन्थनिंग प्रोजेक्ट-आयएसएसपी" या १००% केंद्र पुरस्कृत योजनेबाबत राज्याने दिनांक १७ एप्रिल, २००८ रोजी केंद्र शासनाच्या सांख्यिकी व कार्यक्रम अंमलबजावणी मंत्रालयाकडे "सहभागपत्र" सादर केले होते व त्याप्रमाणे "इंडिया स्टॅटिस्टिकल स्ट्रेन्थनिंग प्रोजेक्ट-आयएसएसपी" ची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी अर्थ व सांख्यिकी संचालनालयाकडे सोपविण्यात आली होती. प्रशासकीय विभागातील सांख्यिकी पध्दतीचे सक्षमीकरण करण्याच्या मूळ उद्देशाने ही "केंद्र पुरस्कृत योजना" राज्यात राबविणे अपेक्षित होते. तथापि, "इंडिया स्टॅटिस्टिकल स्ट्रेन्थनिंग प्रोजेक्ट-आयएसएसपी" संदर्भात अपेक्षित कार्यवाही पूर्ण करता आली नाही.

२. केंद्र शासनाने "इंडिया स्टॅटिस्टिकल स्ट्रेन्थनिंग प्रोजेक्ट-आयएसएसपी" बाबत करण्यात आलेल्या प्रगतीचा सन २०१३-१४ मध्ये राष्ट्रीय पातळीवर आढावा घेऊन हा प्रकल्प "सांख्यिकी सक्षमीकरणासाठी सहाय्य" या १००% केंद्रीय क्षेत्रातील योजनेमध्ये रुपांतर करण्याचा निर्णय घेतला. त्याअनुषंगाने केंद्र शासनासोबत दिनांक ६-३-२०२० रोजी याबाबतीत राज्य शासनाच्या वतीने नियोजन विभागाने "सामंजस्य करार" केलेला आहे.

३. केंद्र शासनाने "सांख्यिकी सक्षमीकरणासाठी सहाय्य" या १००% केंद्रीय क्षेत्रातील योजनेकरीता निर्गमित केलेल्या सुधारित परिचलन मार्गदर्शक सूचनांना अनुसरून i) नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांक डीईएस-२००९/प्र.क्र. ४९/०९/का-१४१७, दिनांक १६ नोव्हेंबर, २०१० अन्वये स्थापित करण्यात आलेली "उच्चस्तरीय सुकाणू समिती" व ii) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक डीईएस-२०१०/प्र.क्र. १२७/१०/का-१४१७, दिनांक २२ नोव्हेंबर, २०१० अन्वये स्थापित करण्यात आलेली "राज्य कार्यकारी समिती" बरखास्त करून नव्याने "राज्य उच्चस्तरीय सुकाणू समिती" व "राज्य अंमलबजावणी समिती" या दोन राज्यस्तरीय समित्या गठीत करण्याचे तसेच अपर मुख्य सचिव व विकास आयुक्त (नियोजन) यांना "नोडल अधिकारी" घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

केंद्र शासनाच्या सांख्यिकी व कार्यक्रम अंमलबजावणी मंत्रालयामार्फत राबविण्यात येत असलेल्या "सांख्यिकी सक्षमीकरणासाठी सहाय्य" या १००% केंद्र पुरस्कृत योजनेकरीता निर्गमित

करण्यात आलेल्या सुधारित परिचलन मार्गदर्शक सूचनांच्या अनुषंगाने राज्य पातळीवर अपेक्षित कार्यवाही व "सामंजस्य करार" कार्यान्वित करण्यासंदर्भात धोरणात्मक निर्णय घेण्याकरीता आणि संनियंत्रण व समन्वय विषयाबाबतीत मार्गदर्शनपर सूचना निर्गमित करण्याकरीता खालीलप्रमाणे "राज्य उच्चस्तरीय सुकाणू समिती" गठीत करण्यात येत आहे.

**"राज्य उच्चस्तरीय सुकाणू समिती"**

| अ.क्र. | अधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १ | मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, नियोजन विभाग | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| ४ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, माहिती तंत्रज्ञान विभाग, | सदस्य |
| ५ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, उद्योग विभाग | सदस्य |
| ६ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, कामगार विभाग | सदस्य |
| ७ | उप महानिदेशक, राष्ट्रीय नमुना पाहणी संघटन, केंद्र शासन, सांख्यिकी व कार्यक्रम अंमलबजावणी मंत्रालय | सदस्य |
| ८ | सह सचिव / उप सचिव, नियोजन विभाग | सदस्य |
| ९ | संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय | सदस्य सचिव |

**"राज्य उच्चस्तरीय सुकाणू समिती"ची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील:**

१) "सांख्यिकी सक्षमीकरणासाठी सहाय्य" या योजनेची अंमलबजावणी व संनियंत्रण संदर्भात प्रशासकीय व वित्तीय बाबींवर धोरणात्मक निर्णय घेण्याचे अधिकार "राज्य उच्चस्तरीय सुकाणू समिती" कडे राहतील.

२) "सांख्यिकी सक्षमीकरणासाठी सहाय्य" या योजनेसंदर्भात करण्यात आलेल्या सामंजस्य करारामधील तरतुदीमध्ये आवश्यक सुधारणा / बदल सुचविण्याचे अधिकार "राज्य उच्चस्तरीय सुकाणू समिती"कडे राहतील.

३) "सांख्यिकी सक्षमीकरणासाठी सहाय्य" या योजनेच्या सुधारित परिचलन मार्गदर्शक सूचनांच्या अंमलबजावणी संदर्भात प्रशासकीय विभागाला निर्देश देण्याचे व त्याबाबतीत आढावा घेण्याचे अधिकार "राज्य उच्चस्तरीय सुकाणू समिती"कडे राहतील.

४) "सांख्यिकी सक्षमीकरणासाठी सहाय्य" या योजनेच्या सामंजस्य कराराची परिणामकारक अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने उपस्थित होणाऱ्या मुद्यांबाबत समन्वय विषयक निर्देश देण्याचे व त्याप्रमाणे कार्यपूर्ती अहवाल घेण्याचे अधिकार "राज्य उच्चस्तरीय सुकाणू समितीकडे" राहतील.

५) "सांख्यिकी सक्षमीकरणासाठी सहाय्य" या योजनेअंतर्गत विशेष महत्व देण्यात आलेली "शाश्वत विकास ध्येय" साध्य करण्याकरीता विशिष्ट ध्येय व त्याअंतर्गत विविध उद्दिष्टांच्या प्रगतीबाबत संबंधित प्रशासकीय विभागांच्या विशेष आढावा बैठका आयोजित करण्याचे अधिकार "राज्य उच्चस्तरीय सुकाणू समिती"कडे राहतील.

२. केंद्र शासनाच्या "सांख्यिकी सक्षमीकरणासाठी सहाय्य" या केंद्र पुरस्कृत योजनेकरीता अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांना "नोडल अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच त्या अनुषंगाने नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक डीईएस-२०१०/प्र.क्र. १२७/१०/का-१४१७, दिनांक २२ नोव्हेंबर, २०१० अन्वये स्थापन करण्यात आलेली "राज्य कार्यकारी समिती" ऐवजी "राज्य अंमलबजावणी समिती" खालीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे.

**"राज्य अंमलबजावणी समिती"**

| अ.क्र. | अधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, नियोजन विभाग | अध्यक्ष |
| २ | विकास आयुक्त (उद्योग), महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| ३ | कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| ४ | संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय | सदस्य |
| ५ | संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय | सदस्य |
| ६ | सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| ७ | सह सचिव / उप सचिव, नियोजन विभाग | सदस्य |
| ८ | मुख्य संशोधन अधिकारी, अर्थ व सांख्यिकी संचालनालय | सदस्य सचिव |

<u>**राज्य अंमलबजावणी समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील:**</u>

१) "सांख्यिकी सक्षमीकरणासाठी सहाय्य" या योजनेसंदर्भात करण्यात आलेल्या सामंजस्य करारामधील कार्यांची कालबध्द उद्दिष्टपूर्ती करण्यासाठी निर्णय घेण्याचे अधिकार "राज्य अंमलबजावणी समिती"कडे राहतील.

२) "सांख्यिकी सक्षमीकरणासाठी सहाय्य" या योजनेसंदर्भात करण्यात आलेल्या सामंजस्य करारामधील कार्यांची क्षेत्रीय अंमलबजावणी यंत्रणाकडून उपस्थित होणाऱ्या मुद्यांबाबत अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत करण्यात येणारी समन्वय पध्दत व प्रणाली निश्चित करण्याचे अधिकार "राज्य अंमलबजावणी समिती"कडे राहतील.

३) "सांख्यिकी सक्षमीकरणासाठी सहाय्य" या योजनेसंदर्भात करण्यात आलेल्या सामंजस्य कराराप्रमाणे अर्थ व सांख्यिकी संचालनालयाला आवश्यक असलेली संगणकीय उपकरणे किंवा आवश्यक सॉफ्टवेअर इत्यादी ई-निविदा पध्दतीने खरेदी करणे किंवा आवश्यक व्यावसायिक सेवा पुरविणाऱ्या संस्थांची निवड करण्याकरीता पध्दती आणि अटी व शर्ती निश्चित करून ई-निविदा पध्दतीने निवड करण्याचे अधिकार "राज्य अंमलबजावणी समिती"कडे राहतील.

४) "सांख्यिकी सक्षमीकरणासाठी सहाय्य" या योजनेसंदर्भात करण्यात आलेल्या सामंजस्य कराराप्रमाणे "शाश्वत विकास ध्येय" व इतर महत्वाच्या कार्यांकरीता आवश्यकतेप्रमाणे सल्लागार व बाह्यस्थ संस्थांची नेमणूक करण्याबाबत निर्णय घेणे तसेच, संशोधन व शैक्षणिक

संस्था आणि स्वयंसेवी / अशासकीय संस्था यांना "शाश्वत विकास ध्येय" मोहिमेत सहभागी करून घेणेबाबत निर्णय घेण्याचे अधिकार "राज्य अंमलबजावणी समिती"कडे राहतील.

५) "सांख्यिकी सक्षमीकरणासाठी सहाय्य" या योजनेसंदर्भात करण्यात आलेल्या सामंजस्य कराराप्रमाणे अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या अधिनस्त प्रादेशिक सह संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, उप आयुक्त (नियोजन), जिल्हा नियोजन अधिकारी व जिल्हा सांख्यिकी अधिकारी यांच्या स्तरावर वर्ग करण्यात येणाऱ्या कार्याची अंमलबजावणी संदर्भात सर्वसमावेशक समन्वय बैठका आवश्यकतेनुसार आयोजित करण्याचे अधिकार "राज्य अंमलबजावणी समिती"कडे राहतील.

३. केंद्र शासनाच्या "सांख्यिकी सक्षमीकरणासाठी सहाय्य" या योजनेच्या अंमलबजावणीसाठी गठीत करण्यात आलेल्या १) "राज्य उच्चस्तरीय सुकाणू समिती" व २) "राज्य अंमलबजावणी समिती" यांच्या बैठका अध्यक्षांच्या निर्देशाप्रमाणे आयोजित केल्या जातील. तसेच तीन महिन्यात किमान एक बैठक आयोजित करुन घेण्याची जबाबदारी संबंधित राज्यस्तरीय समितीच्या "सदस्य सचिव" यांची राहील.

४. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१००९१५१९३७०११६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADNYA MAHALE

Digitally signed by PRADNYA MAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=31c8683f52ccbefd97bce49983c4151d2caf1c185c657ea855ac85f31e5f681e, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=f0b9244e8f45f12e0a399cd036d6d3767c67c8349951e3e5047b7469a24cdfb2, ou=PLANNING DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PRADNYA MAHALE
Date: 2020.10.14 18:01:43 +05'30'

**(प्रज्ञा महाले)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हील, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. मंत्री व मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, (सर्व) मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) उप महानिदेशक, सांख्यिकी एवं कार्यक्रम अंमलबजावणी मंत्रालय, केंद्र शासन,नवी मुंबई
८) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, वांद्रे (पूर्व), मुंबई
९) सह संचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय (सर्व)
१०) मुख्य संशोधन अधिकारी, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, वांद्रे (पूर्व), मुंबई
११) उप आयुक्त (नियोजन), विभागीय उपआयुक्त कार्यालय (सर्व)
१२) जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय (सर्व)
१३) जिल्हा सांख्यिकी अधिकारी, जिल्हा सांख्यिकी कार्यालय (सर्व)
१४) निवड नस्ती (का-१४१७), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई